शासन निर्णय पूरकपत्र

**महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याच्या योजनेसाठी सन २०१६-१७ मध्ये निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय पूरकपत्र क्रमांकः सांख्यिकी -२०१६/प्र.क्र.१६४/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
तारीख: २४ मार्च, २०१७

वाचा -

**१) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१६/प्र.क्र.५/११-अे, दि.२०.१०.२०१६**
**२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ -३, दि.२०.४.२०१६**
**३) भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र. २-१/२०१६-ASI-ES दि.०७.०६.२०१६**
**४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.सां.-४/आयसीएस/४८/२०१६, दि. ३०.१२.२०१६**
**५) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१६/प्र.क्र.५/११-अे, दि.२२.०२.२०१७**
**६) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. सांख्यिकी-२०१६/प्र.क्र.१६४/११-अे, दि.१५.०३.२०१७**
**७) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. सां.टि.आर.अे/१३/२०१६, दि.१६.०३.२०१७**

प्रस्तावना -

महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेकरीता केंद्र शासनाने सन २०१६-१७ या वर्षाकरीता केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तीन हप्त्याची मिळून १७५.५० लाख इतकी रक्कम तसेच सन २०१५-१६ या वर्षातील रु.२४.२७ लाख इतकी अखर्चित रक्कम सन २०१६-१७ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाने दि.०७.०६.२०१६ च्या पत्राने दिलेली मान्यता अशा एकुण रु.१९९.७७ लाख (१७५.५० लाख + २४.२७ लाख )इतक्या रकमेतून रु. ८०.३२ लाख लेखानुदान वजा करता उर्वरीत रु.११९.४५ लाख इतकी रक्कम दि.१५.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेली आहे. तथापि, दि.१५.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रु.११९.४५ लाख इतकी संपूर्ण रक्कम ०१ वेतन या बाबीखाली वितरीत न करता प्रशासकीय मान्यतेनुसार बाबनिहाय वितरीत होणे आवश्यक असल्यामुळे खालीलप्रमाणे बाब निहाय संगणकीय मासिक वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात यावी, अशी विनंती कृषि आयुक्तालयाने दि.१६.०३.२०१७ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सन २०१६-१७ या वर्षाकरीता केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तीन हप्त्याची मिळून १७५.५० लाख इतकी रक्कम तसेच सन २०१५-१६ या वर्षातील रु.२४.२७ लाख इतकी

अखर्चित रक्कम सन २०१६-१७ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाने दि.०७.०६.२०१६ च्या पत्राने दिलेली मान्यता अशा एकुण रु.१९९.७७ लाख (१७५.५० लाख + २४.२७ लाख )इतक्या रकमेतून रु. ८०.३२ लाख लेखानुदान वजा करता उर्वरीत रु.११९.४५ लाख इतक्या रकमेबाबत बाबनिहाय वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय पूरकपत्र :-**

महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेकरीता केंद्र शासनाने सन २०१६-१७ या वर्षाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या तीन हप्त्याची मिळून रु. १७५.५० लाख इतकी रक्कम तसेच सन २०१५-१६ या वर्षातील रु.२४.२७ लाख इतकी अखर्चित रक्कम अशा एकुण रु. १९९.७७ लाख रकमेतून ०१-वेतन या बाबीकरीता रु. ८०.३२ लाख लेखानुदान प्राप्त झालेले असल्याने सदर लेखानुदान वजा करता दि.१५.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली उर्वरित रु. ११९.४५ लाख इतकी रक्कम संगणकीय मासिक वितरण प्रणालीवर खालीलप्रमाणे बाब निहाय वितरीत करण्यात येत आहे.

| **योजनेचे नाव- प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना सन २०१५-१६ मधील अखर्चित अनुदान व सन २०१६-१७ मध्ये प्राप्त अनुदान** | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **उपलेखाशिर्ष** | **सन २०१६-१७ महिना - मार्च२०१७** | **एकुण अनुदान** |
| १ | ०१ वेतन | ११०.४५ | ११०.४५ |
| २ | ११ देशांतर्गत प्रवास | २.०० | २.०० |
| ३ | १३ कार्यालयीन खर्च | ४.०० | ४.०० |
| ४ | १६ प्रकाशने | २.०० | २.०० |
| ५ | २४ पेट्रोल / इंधन | १.०० | १.०० |
| **एकुण** | | **११९.४५** | **११९.४५** |

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**"मागणी क्रमांक डी-३, २४०१, पीक संवर्धन,**
**(००) (१११) कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**
**(००) (११) पिकांच्या आकडेवारीत सुधारणा,**
**(केंद्र पुरस्कृत) (२४०१ २५६९)"**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा निधी वितरीत करणेबाबत प्रस्तुत आदेश वित्त विभागाच्या उपरोक्त दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१७२१३५३२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.03.24 17:22:06 +05'30'

**(श. बा. पावसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (वि.व प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई
८. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, नागपूर
९. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२,नागपूर
१०.संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२.वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३.नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१५.उपसचिव (११-अे / २-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१६.कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१७.निवड नस्ती, का.११-अे